राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत सन २०२१-२२ च्या प्रकल्प अंमलबजावणी आराखडा (PIP) मध्ये विविध FMR Code अंतर्गत आशा योजनेकरीता मंजूर करण्यात आलेल्या निधीमधून विविध प्रकारची साधन सामुग्रीच्या खरेदी/ छपाईसाठी प्रशासकिय मान्यता देण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२१/प्र.क्र.४१/आरोग्य-७

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : ३१ डिसेंबर, २०२१.

वाचा :-

१. सहसंचालक (अतांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्रमांक.राआअ/प्रशासकीय मान्यता/६३६७/स्मार्टफोन/७१०६६-६७/२०२१, दिनांक २२.१०.२०२१.
२. सहसंचालक (अतांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्रमांक.राआअ/प्रशासकीय मान्यता/एचबीवायसी किट/७१०७९-८०/२०२१, दिनांक २२.१०.२०२१.
३. सहसंचालक (अतांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्रमांक.राआअ/प्रशासकीय मान्यता/एचबीएनसी-बुकलेट/७१०७३-७४/२०२१, दिनांक २२.१०.२०२१.
४. सहसंचालक (अतांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्रमांक.राआअ/प्रशासकीय मान्यता/एचबीएनसी किट साहित्य/७१०६८-६९/२०२१, दिनांक २२.१०.२०२१.
५. सहसंचालक (अतांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्रमांक.राआअ/प्रशासकीय मान्यता/एचबीवायसी किट/७१०७९-८०/२०२१, दिनांक २२.१०.२०२१.
६. सहसंचालक (अतांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्रमांक.राआअ/आशा डायरी/छपाई/७१०७०-७२/२०२१, दिनांक २२.१०.२०२१.
७. सहसंचालक (अतांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्रमांक.राआअ/प्रशासकीय मान्यता/एचबीवायसी किट/७१०७७-७८/२०२१, दिनांक २२.१०.२०२१

प्रस्तावना:-

राज्यात राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत आशा योजनेची अंमलबजावणी सुरु असून सद्यस्थिती ग्रामीण भागात आशांची ६१२१५ व नागरी भागात १०७४४ अशी एकूण ७१९५९ आशांची पदे व गटप्रवर्तकांची ३६४४ पदे मंजूर करण्यात आलेली आहेत. उपरोक्त संदर्भ क्र.१ ते ७ अन्वये आरोग्य सेवा आयुक्तालयाने आशांनी केलेल्या विविध कामांची नोंद करण्याकरीता स्मार्ट फोन खरेदी, ईट टू राईट इंडिया कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्याकरीता ईट टू राईट टूल किट खरेदी, राज्यात आशांमार्फत नवजात मृत्यू कमी करण्याकरीता एचबीएनसी कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी एचबीएनसी कार्ड

छपाई व एचबीएनसी किट खरेदी, आशा डायरीची छपाई, एचबीवायसी-ईसीडी किट खरेदी आणि सी-बँक प्रपत्र व इन्युमरेशन प्रपत्राची छपाई करण्याचे प्रस्तावित केले आहे. राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत सन २०२१-२२ च्या मंजूर पी.आय.पी. मधील विविध FMR Code अंतर्गत सदर साधन सामुग्री खरेदी/ छपाई करण्याच्या एकत्रित एकुण रु.१५१२.२३ लक्ष इतक्या रकमेच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत सन २०२१-२२ च्या प्रकल्प अंमलबजावणी आराखडा (PIP) मध्ये विविध FMR Code अंतर्गत आशा योजनेकरीता मंजूर करण्यात आलेल्या निधीमधून स्मार्ट फोन, ईट टू राईट स्टुल किट, एचएनबीसी किट, एचडीवायसी-ईसीडी किट खरेदी आणि आशा डायरी, एचएनबीसी कार्डची आणि सी-बॅक प्रपत्र व इन्युमरेशन प्रपत्राच्या छपाई या साधन सामुग्रीसाठी येणाऱ्या एकत्रित एकुण रु.१५१२.२३ लक्ष इतक्या रकमेच्या प्रस्तावास खालील तक्त्यांमध्ये नमूद केल्याप्रमाणे आणि विविध अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) **स्मार्ट फोन खरेदी** :-

| अ.क्र. | खरेदी करावयाचे साहित्य | FMR Code | प्रती स्मार्ट फोन | स्मार्ट फोनची संख्या | एकूण रक्कम (लाखात) |
|---|---|---|---|---|---|
| १ | स्मार्ट फोन | ३.१.३.३ | रु.८०००/- | ३७५६ | रु.३००.४८ |
| २ | स्मार्ट फोन | U.३.१.३.३ | रु.८०००/- | २६११ | रु.२०८.८८ |
| | **एकूण** | | | **६३६७** | **रु.५०९.३६** |

**२) ईट टू राईट टूल किट खरेदी :-**

| अ.क्र. | खरेदी करावयाचे साहित्य | FMR Code | प्रती किट दर | किटची संख्या | एकूण रक्कम (लाखात) |
|---|---|---|---|---|---|
| १ | ईट टू राईट टूल किट | १२.२.२ | रु.७००/- | २१७०० | रु.१५१.९० |

**३) एचबीएनसी बुकलेट (कार्ड) छपाई :-**

| अ.क्र. | छपाईच्या बाबी | FMR Code | प्रती कार्ड दर | कार्डची संख्या | एकूण रक्कम (लाखात) |
|---|---|---|---|---|---|
| १ | एचबीएनसी कार्ड | १२.२.२ | रु.४/- | ९००००० | रु.३६.०० |

**४) आशा डायरी छपाई :-**

| अ.क्र. | छपाईच्या बाबी | FMR Code | प्रती कार्ड दर | कार्डची संख्या | एकूण रक्कम (लाखात) |
|---|---|---|---|---|---|
| १ | आशा डायरी | १२.२.२ | रु.७९.१४/- | ६०८७५ | रु.४८.१८ |

### ५) एचबीएनसी किट खरेदी :-

| अ.क्र. | क्षेत्र | आर्थिक वर्ष | FMR Code | मंजूर बाब | प्रती कार्ड दर | कार्डची संख्या | एकूण रक्कम (लाखात) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | ग्रामीण भाग | २०२१-२२ | ६.२.६.३ | New ASHA HBNC Kit | रु.१०००/- | २००० | रु.२०.०० |
| | | २०२१-२२ | ६.२.६.४ | Replenishment of ASHA HBNC and HBYC Kit | रु.१०००/- | ७५०० | रु.७५.०० |
| २ | उर्वरित महाराष्ट्र | २०२१-२२ | U.६.२.२.२ | New ASHA HBNC Kit | रु.१०००/- | ६५११ | रु.६५.११ |
| ३ | एमसीजीएम | २०२१-२२ | U.६.२.२.२ | New ASHA HBNC Kit | रु.१०००/- | ४०० | रु.४.०० |
| | **एकूण** | | | | | **१६४११** | **रु.१६४.११** |

### ६) एचबीवायसी- ईसीडी किट खरेदी :-

| अ.क्र. | खरेदी करावयाचे साहित्य | क्षेत्र | FMR Code | प्रती किट दर | किटची संख्या | एकूण रक्कम (लाखात) |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | एचबीवायसी- ईसीडी किट | ग्रामीण भाग | ६.२.६.६ | रु.१०००/- | ३३९६८ | रु.३३९.६८ |
| २ | | उर्वरित महाराष्ट्र | U.६.२.२.२ | रु.१०००/- | ६५११ | रु.६५.०० |
| ३ | | मुंबई महानगरपालिका | U.६.२.२.२ | रु.१०००/- | ४०० | रु.४.०० |
| | **एकूण** | | | | **४०८७९** | **रु.४०८.६८** |

### ७) सी-बॅक प्रपत्र व इन्युमरेशन प्रपत्र छपाई :-

| अ.क्र. | क्षेत्र | मंजूर बाब | FMR Code | प्रती प्रपत्र दर | प्रपत्रांची संख्या | एकूण रक्कम (लाखात) |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | ग्रामीण भाग | सी-बॅक प्रपत्र | १२.७.३ | रु.१/- | ११०९२४४८ | रु.२०.०० |
| | | इन्युमरेशन प्रपत्र | १२.७.३ | रु.१.२५/- | २२१८४९० | रु.२७.७३ |
| २ | शहरी भाग | सी-बॅक प्रपत्र | U.१२.१ | रु.१/- | ४३४८५५७ | रु.४४.४८ |
| ३ | | इन्युमरेशन प्रपत्र | U.१२.१ | रु.१.२५/- | ८६९७११ | रु.१०.८७ |
| | **एकूण** | | | | | **रु.१९४.००** |

०३. सदर प्रशासकीय मान्यता ही खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

१) सदर औषधे व औषधे साहित्ये सामुग्रीची आवश्यकता / मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबीच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदरहू औषधे व औषधे साहित्ये सामुग्रीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित

तज्ञांनी तांत्रिक समिती / अधिकारी यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसावे तसेच सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले खातरजमा करण्यात यावी, पीआयपी मध्ये मंजूर असलेल्या बाबीच्या शांत्रिक विर्निदेशानुसार मागणीपत्र पाठविण्याची जबाबदारी संबंधीत कार्यक्रम प्रमुखांची राहिल. प्रस्तावातील समाविष्ट असलेल्या बाबीचीच खरेदी करण्यात यावी.

३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क. भांखस-२०१५/प्र.क्र.८२/भाग उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत, त्यामुळे GEM Portal, इतर राज्यांचे दरकरार यांच्याकडील उपलब्ध असलेले न्युनतम दर विचारात घेण्यात यावेत. तसेच हाफकिन संस्थेमार्फत सदर बाबींची खरेदी केली जात असल्यास अथवा झालेली असल्यास निविदेत प्राप्त झालेले न्युनतम दर निविदेकरीता मागणी नोंदवितांना उपकरणांच्या संदर्भात अंदाजित दर म्हणून नोंदविण्यात यावेत व खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व/ पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/ Post dispatch random sample Inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी,

६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

७) तसेच राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत प्रकल्प अंमलबजावणी आराखडा (PIP) अंतर्गत विविध लेखाशिर्षांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. सदरची खरेदी प्रशासकीय मंजुरीच्या विहित कालावधीत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी. तसेच सदर बाबींचा पुरवठा आदेश देण्यापूर्वी निधीची उपलब्धताही तपासून घेण्यात यावी.

८) तसेच या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

९) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र. समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्वता करण्यात यावी.

११) खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत. सदर प्रकरणी सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.खरेदी २०१६/प्र.क. २४०/आरोग्य-८ दिनांक २६ जुलै २०१७ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

०२. उपरोक्त अनुक्रमांक १ ते ११ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, संचालक, आरोग्य सेवा संचालनालय व कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

०३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत त्यानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२११८०५०७०४१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30,
cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2021.12.31 12:37:23 +05'30'

(वि. ल. लहाने)
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई

२) व्यवस्थापकिय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि. परेल, मुंबई

३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.

४) सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई

५) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई

६) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) , आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई

७) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई

८) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), नागपूर

९) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई

१०) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई

११) अधिक्षक, विभागिय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती/नाशिक

१२) निवडनस्ती (आरोग्य-८)